सा. बां. विभागांतर्गत तयार करण्यात येणाऱ्या प्रकल्पांच्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी छाननीकरिता सुधारीत समिती गठित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. सीएटी-२०२४/प्र.क्र.१०७/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २८/०६/२०२४

**वाचा :- सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.सीएटी २०१८/प्र.क्र.११५/इमा-२, दि.०५/११/२०१८**

**प्रस्तावना :-**

सा.बां.विभागाकडून रस्ते, पूल व इमारतींच्या कामांचे सविस्तर नकाशे व अंदाजपत्रके तयार करुन व त्यासाठी तांत्रिक मंजूरी प्रदान केल्यानंतर निविदानिश्चिती होऊन कामे हाती घेतली जातात. वस्तुत: तांत्रिक मंजूरी देताना या बाबतचा प्राधिकारी हा महाराष्ट्र शासन सा.बां.नियमावलीतील नियम परिशिष्ट-४२ नुसार स्वतंत्र व पूर्ण सक्षम आहे. भविष्यात नकाशे व अंदाजपत्रकांमध्ये त्रुटी राहू नयेत व सर्वस्वी योग्य असे तांत्रिकदृष्टया निकोप नकाशे व अंदाजपत्रके तयार व्हावीत, यासाठी अंदाजपत्रकांची तांत्रिक मंजूरीपूर्व छाननी व अंदाजपत्रकातील तरतूदी तपासणे व त्यास मान्यता देण्यासाठी संबंधित मंडळ स्तर व प्रादेशिक विभाग स्तरावर शासन परिपत्रक क्र.सीएटी २०१८/ प्र.क्र.११५/इमा-२, दि.५/११/२०१८ अन्वये समिती गठीत करण्यात आली होती.

तथापि दक्षता व गुणनियंत्रण मंडळास वगळून सुधारीत समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. सदरची कारणे पुढीलप्रमाणे आहेत.

१) अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता, दक्षता गुणनियंत्रण मंडळ हे त्यांचे कामांच्या अचानक व नियमित तपासण्या, तक्रारीची प्रकरणे, चौकश्या इ. कामांनिमित्त दौ-यावर जावे लागत असल्याने तांत्रीक मान्यता समितीच्या बैठकांना हजर राहू शकत नाहीत. त्यामुळे तांत्रीक मान्यता प्रदान करताना विलंब होतो.

२) दक्षता व गुण नियंत्रण मंडळाचे काम हे checks & Balance मधील checks प्रमाणे असल्याने त्यांना तांत्रीक मान्यतेत सहभागी केल्यानंतर तक्रार किंवा तत्सम प्रकरणी तांत्रीक मान्यता अंदाजपत्रकाचे अन्वेषण करताना त्यांचेकडून पुरेसे नि:पक्षपातीपणे काम होईल असे खात्रीने म्हणता येणार नाही.

२. दिनांक १६/१२/२०१५ च्या “वित्तीय अधिकारात सुधारणा” शासन निर्णयानुसार अधीक्षक अभियंता यांना रु.२.५० कोटीपर्यंत तांत्रिक मंजूरी देणे व मुख्य अभियंता यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

३. या सर्व बाबींचा विचार करुन योग्य निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन दक्षता व गुणनियंत्रण मंडळ यांना वगळून खालीलप्रमाणे सुधारीत परिपत्रक निर्गमित करीत आहे :-

**शासन परिपत्रक :-**

वरील प्रस्तावनेच्या पार्श्वभूमीवर क्षेत्रिय स्तरावर तांत्रिक मान्यता पूर्व अंदाजपत्रक सुधारीत छाननी समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात येत असून सदर समितीमध्ये दक्षता व गुणनियंत्रण मंडळ यांना वगळून सुधारीत समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

अ) रु.२.५० कोटीपेक्षा जास्त रकमेच्या रस्ते व पुल कामांबाबतची सुधारीत तांत्रिक छाननी समिती (मुख्य अभियंता स्तरावरील)

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष | :- | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग |
| २. | सदस्य | :- | संबंधित अधीक्षक अभियंता |
| ३. | सदस्य | :- | प्रादेशिक विभागातील अन्य अधीक्षक अभियंता |
| ४. | सदस्य सचिव | :- | संबंधित कार्यकारी अभियंता |

ब) रुपये २.५० कोटीपेक्षा जास्त रकमेच्या इमारतींच्या कामांबाबतची सुधारीत तांत्रिक छाननी समिती (मुख्य अभियंता स्तरावरील समिती )

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष | :- | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग |
| २. | सदस्य | :- | संबंधित अधीक्षक अभियंता |
| ३. | सदस्य | :- | प्रादेशिक विभागातील अन्य अधीक्षक अभियंता |
| ४. | सदस्य | :- | अधीक्षक अभियंता (विद्युत)/ कार्यकारी अभियंता (विद्युत) |
| ५. | सदस्य सचिव | :- | संबंधित कार्यकारी अभियंता |

क) रुपये २.५० कोटीपर्यंत रस्ते व पुल कामांबाबतची सुधारीत तांत्रिक छाननी समिती (अधीक्षक अभियंता स्तरावरील समिती )

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष | :- | अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ |
| २. | सदस्य | :- | मंडळातील अन्य कार्यकारी अभियंता |
| ३. | सदस्य सचिव | :- | संबंधित कार्यकारी अभियंता |

ड) रुपये २.५० कोटीपर्यंत इमारतींच्या कामांबाबतची सुधारीत तांत्रिक छाननी समिती (अधीक्षक अभियंता स्तरावरील समिती )

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष | :- | अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ |
| २. | सदस्य | :- | मंडळातील अन्य कार्यकारी अभियंता |
| ३. | सदस्य | :- | कार्यकारी अभियंता (विद्युत)/उप अभियंता (विद्युत) |
| ४. | सदस्य सचिव | :- | संबंधित कार्यकारी अभियंता |

२. या समितीकडून उपरोक्त प्रमाणे अंदाजपत्रकांची यथायोग्य छाननी करण्यात येईल व तद्नंतर संबंधीत प्राधिकारी या कामांस तांत्रिक मंजूरी प्रदान करतील. आवश्यकता असल्यास समितीतील संबंधित एक अथवा दोन सदस्यांनी कामाच्या जागेची प्रत्यक्ष पहाणी करावी. तांत्रिक मंजूरी देण्यापूर्वी सर्व महत्त्वाची कामे अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता हे पहाणी करतात, तथापि समितीतील एक व दोन सदस्यांनी अशी पहाणी केल्यास नजरचुकीचे संबंधित अधिका-यांकडून काही तरतूदी करावयाचा राहून गेल्या तर अंदाजपत्रकांच्या छाननीच्या वेळेस त्यातील तरतूदीबाबत समितीच्या बैठकीत विचारविनिमय होऊन सर्व समिती सदस्यांचे एकत्रित ज्ञान (Collective Wisdom of all Engineers) वापरुन अत्यंत निकोप व तांत्रिकदृष्टया सुयोग्य असे अंदाजपत्रक अंतिम मंजूरीसाठी उपलब्ध होईल. या समितींच्या बैठका किमान पाक्षिक ठेवण्यात याव्यात, जेणेकरुन प्रादेशिक विभागस्तरावर / मंडळ स्तरावर द्यावयाच्या तांत्रिक मंजूरीपूर्वी प्रादेशिक विभागाने / मंडळाने प्राप्त झालेल्या सविस्तर नकाशे व अंदाजपत्रक या समितीकडून पूर्ण छाननी होऊन संबंधित अधिका-याकडे तांत्रिक मंजूरीसाठी प्राप्त होतील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०११८२७१२३८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DIPALI PRADEEP GHORPADE

Digitally signed by DIPALI PRADEEP GHORPADE
DN: c=IN, o=PERSONAL, title=2574, pseudonym=42119cf54e494087b5182b557516d201, 2.5.4.20=8fdc37406c155f20f5ae0988e9a1c7b6a744659f8b36110f5f0f8280ca07337d, postalCode=415519, st=Maharashtra, serialNumber=c5855ef7a773be6fd8251ed7d445fc477ec7a301e0a190847d151267a928a7ff, cn=DIPALI PRADEEP GHORPADE
Date: 2024.07.01 18:38:35 +05'30'

**( दिपाली प्रदिप घोरपडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (सा.बां)/सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग यांचे स्वीय सहाय्यक
२) सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग
३) सर्व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ
४) सर्व अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ,
५) अधीक्षक अभियंता, सा.बां (विद्युत) मंडळ
६) सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग
७) कार्यकारी अभियंता, सा.बां (विद्युत) विभाग
८) सर्व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय
९) इमारती-२ कार्यासन संग्रहार्थ (निवडनस्ती)